**महिला व बाल विकास विभाग (खुद्द) व विभागाच्या अधिपत्याखालील कार्यालयांसाठी नियुक्त केलेल्या ई ॲन्ड वाय (Ernst & Young) या संस्थेच्या सल्लागारांचे दि. १.९.२०२४ ते दि. २८.२.२०२५ या कालावधीतील मानधन अदा करण्यास मान्यता देणे**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : आस्था-२०२४/प्र.क्र.७७ /का-१**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक :- १९ मार्च, २०२५

संदर्भ :- १) माहिती तंत्रज्ञान संचालनालयाचे परिपत्रक दि. GAD-IT-०८०/४/२०१४-०/० DIRECTORATE OF IT-DIT ( MH), दि. ०५/१०/२०२३
२) महिला व बाल विकास विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या दि. १९.३.२०२४ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त
३) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक, समक्रमांक, दि. ८.४.२०२४
४) महिला व बाल विकास विभाग, शासन निर्णय,समक्रमांक दि. २९.१.२०२५

**प्रस्तावना:-**

महिला व बाल विकास विभाग व त्याच्या अखत्यारीतील क्षेत्रिय कार्यालये, महामंडळ, आयोग इ. करीता संगणकीकरण / ई गव्हर्नन्स प्रकल्प अंमलबजावणीकरीता संगणक विषयक प्रस्तावांवर निर्णय घेण्यासाठी विभागाच्या दिनांक २४ मे २०१३ च्या शासन निर्णयानुसार प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात आलेली आहे.

२. सदर समितीने **ई ॲन्ड वाय ( Ernst & Young)** या संस्थेचे ६ सल्लागार (२ प्रधान सल्लागार , १ वरिष्ठ सल्लागार, १ असोसिएट सल्लागार व २ सल्लागार) एक वर्षासाठी नियुक्त करण्यास मान्यता दिलेली आहे. त्यानुसार या विभागाच्या संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयान्वये ६ सल्लागारांची दिनांक ०८/०४/२०२४ ते दि.३१/०३/२०२५ या कालावधीसाठी नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात आली होती. त्यानुसार सदर संस्थेच्या ६ सल्लगारांच्या दि. ८.४.२०२४ ते दि. ३१.८.२०२४ या कालावधीतील मानधनाची देयके यापूर्वीच अदा करण्यात आली आहेत. आता संस्थेने दि. १.९.२०२४ ते दि. २८.२.२०२५ या कालावधीतील मानधनाची देयके सादर केली असून सदर देयके अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

महिला व बाल विकास विभाग तसेच विभागाच्या अधिपत्याखालील क्षेत्रीय कार्यालयांतील संगणकीकरण/ई-गव्हर्नन्स प्रकल्प अंमलबजावणीकरीता संदर्भाधीन क्र. ३ येथील शासन निर्णयांन्वये **ई ॲन्ड वाय ( Ernst & Young) या संस्थेचे** ६ सल्लागार (२ प्रधान सल्लागार, १ वरिष्ठ सल्लागार, १ असोसिएट सल्लागार व २ सल्लागार) यांची एक वर्षासाठी नियुक्ती करण्यास मान्यता दिलेली आहे. सदर सल्लागारांना माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाच्या संदर्भाधीन क्र. १ येथील शासन निर्णयान्वयें निश्चित केलेल्या दराने मानधन अनुज्ञेय आहे. त्यानुसार प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे **ई ॲन्ड वाय ( Ernst & Young)** या संस्थेकडून सदर ६ सल्लागारांच्या सेवा विभागास उपलब्ध करुन देण्यात आल्या होत्या. तथापि, त्यापैकी १ प्रधान सल्लगार, १ सल्लागार व १ असोसिएट सल्लागार यांच्या सेवा विभागाने दि. १.९.२०२४ पासून संस्थेस

परत केल्या आहेत. यास्तव आता उर्वरित ३ सल्लागारांच्या मानधनाची दि. १.९.२०२४ ते २८.२.२०२५ या कालावधीतील देयके विभागास सादर केली असून त्यांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | कालावधी | देयकाचा क्र. व दिनांक | वस्तु व सेवाकरांसह देयकाची रक्कम (रुपये हजारांत) |
|---|---|---|---|
| १ | ०१.०९.२०२४ ते ३०.०९.२०२४ | IN91MH5M044896, दि. 18.02.2025 | १३,९७,१२०/- |
| २ | ०१.१०.२०२४ ते ३१.१०.२०२४ | IN91MH5M046232, दि. 28.02.2025 | १३,९७,१२०/- |
| ३ | ०१.११.२०२४ ते ३०.११.२०२४ | IN91MH5M046233, दि. 28.02.2025 | १३,९७,१२०/- |
| ४ | ०१.१२.२०२४ ते ३१.१२.२०२४ | IN91MH5M046234, दि. 28.02.2025 | १३,९७,१२०/- |
| ५ | ०१.०१.२०२५ ते ३१.०१.२०२५ | IN91MH5M046235, दि. 28.02.2025 | १३,९७,१२०/- |
| 6 | ०१.०२.२०२५ ते २८.०२.२०२५ | IN91MH5M047126, दि. 06.03.2025 | १३,९७,१२०/- |
| | एकूण... | | ८३,८२,७२०/- |

२. उपरोक्त नमूद सल्लागारांनी त्यांच्यावर सोपविलेल्या जबाबदाऱ्या वेळच्यावेळी पार पाडल्या आहेत. त्याबाबतचा त्यांनी केलेल्या कामाचा मासिक अहवाल आस्थापना शाखेस सादर करण्यात आला आहे.

३. या प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्रमांक X-२, २२५१ सचिवालय सामाजिक सेवा (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्प, (०१)(०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी (कार्यक्रम), १७ संगणक खर्च ( २२५१ ०८७५ ) अंतर्गत सन २०२४-२५ या वर्षी उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय वित्त व नियोजन विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ अनुक्रमे अनौसं क्र. २९९/२०२४/व्यय-६, दि. २५.१०.२०२४ व अनौ. सं. क्र. ३१७/का.१४७२, दि. १७.१०.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३१९१५४७२५२७३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NEELIMA PRAMOD CHAUDHARI

Digitally signed by NEELIMA PRAMOD CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2d492c577d5f8956310c91dc01ffb9a071206c77d27a3be4e52d7c1b29fcf933, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA21FB5959CBBFBF3AA97101D99F5D77D2333AE1AC39229E507A3EBF86EC6CD4, cn=NEELIMA PRAMOD CHAUDHARI
Date: 2025.03.19 15:48:46 +05'30'

( नीलिमा चौधरी )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री / मा.राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

५) प्रधान सचिव, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.

६) प्रधान सचिव, (मा.तं.), माहिती व तंत्रज्ञान विभाग,मंत्रालय, मुंबई.

७) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

८) आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.

९) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, बेलापूर, नवी मुंबई.

१०) महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.

११) सह सचिव/उप सचिव, वित्त विभाग, (व्यय-६) /

१२) सह सचिव/उप सचिव, नियोजन विभाग (का.१४७२), मंत्रालय, मुंबई.

१३) राज्य सूचना अधिकारी (NIC), नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई.

१४) सह संचालक (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई.

१५) व्यवस्थापक, **ई ॲन्ड वाय ( Ernst & Young)** कंपनी, मुंबई /संबंधित सल्लागार.

१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१७) निवासी लेखा परिक्षा अधिकारी , मुंबई.

१८) कक्ष अधिकारी ( रोखशाखा ), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.३२.

१९)निवडनस्ती (का-१),महिला व बाल विकास विभाग. मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.